पशुसंवर्धन विभागामधील गट- अ व गट- ब अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः पसंप्र-२०१४ /प्र.क्र. ४१२ / पदुम-१
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, ५ वा मजला विस्तार,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- ३० डिसेंबर, २०१४

**वाचा :-**

१) **महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.**

२) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/१२ दि. २६.११.२०१४.**

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदलीचे विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम २००५, अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम- ६ मध्ये गट- अ व गट- ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या करण्यास सक्षम प्राधिकारी निश्चित करण्यात आलेले आहेत. सदर अधिनियमातील कलम- ६ मधील परंतुक २ व कलम ७ मधील तरतुदीनुसार पशुसंवर्धन विभागातील गट- अ व गट- ब संवर्गातील बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, च्या कलम ६ मधील परंतुक २ व कलम ७ नुसार पशुसंवर्धन विभागामधील गट- अ व गट- ब संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे प्रत्यार्पित करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचा पाचव्या वेतन आयोगातील वेतनश्रेणीनुसार गट | महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकारी | बदली करण्याचा अधिकार प्रत्यार्पित करावयाचा अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | रु. १०,६५० -१५,८५० व त्यापेक्षा अधिक वेतनश्रेणी असलेले गट- अ मधील सर्व अधिकारी | मा. मुख्यमंत्री | मा. मंत्री |
| २ | रु. १०,६५० -१५,८५० पेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट- अ मधील सर्व अधिकारी | मा. मंत्री (पदुम) | सचिव (पदुम) |
| ३ | रु. ७४५०-११,५०० व त्यापेक्षा कमी वेतनश्रेणी असलेले गट- ब मधील सर्व अधिकारी | मा. मंत्री (पदुम) | आयुक्त पशुसंवर्धन |

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५, नुसार सविस्तर मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०११२५८१३२३०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Patil Bhaskar Raghunath

Digitally signed by Patil Bhaskar Raghunath
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Patil Bhaskar Raghunath
Date: 2015.01.01 15:03:12 +05'30'

**(भा. र. पाटील)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२
४. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ३२
५. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-७.
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७. सर्व प्रादेशिक पशुसवंर्धन सहआयुक्त.
८. सर्व जिल्हा पशुसवंर्धन उपायुक्त.
९. सर्व जिल्हा पशुसवंर्धन अधिकारी
१०. उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (पदुम कार्यासने), कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती.